"निसर्ग" चक्रीवादळामुळे बाधित झालेल्या व्यक्तींना मदत वाटप करण्यासाठी रायगड, रत्नागिरी जिल्हयांना निधी वितरित करण्याबाबत.....

महाराष्ट्र शासन
महसुल व वन विभाग
शासन निर्णय, क्रमांक : सीएलएस-२०२०/प्र.क्र.१३६(भाग-२)/म-३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १८ जून, २०२०

संदर्भ : १) शासन निर्णय, क्रमांक : सीएलएस-२०१५/प्र.क्र.४० /म -३, दिनांक १३.०५.२०१५
२) शासन निर्णय, क्रमांक : सीएलएस-२०१७/प्र.क्र.२६७ /म -३, दिनांक २५.०१.२०१८
३) शासन निर्णय,क्रमांक: सीएलएस-२०२०/प्र.क्र.१३६ /म -३, दिनांक ०५.०६.२०२०
४) शासन निर्णय, क्रमांक: सीएलएस-२०२०/प्र.क्र.१३६ /म -३, दिनांक १०.०६.२०२०
५) शासन निर्णय, क्रमांक : सीएलएस - २०२०/प्र.क्र.१३६ (भाग-२) /म -३, दिनांक ११.०६.२०२०
६) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्रमांक: मशा/नै.आ./कार्या-६/निसर्ग वादळ अनु./राय.रत्ना/२०, दिनांक १७.६.२०२०

प्रस्तावना:

दिनांक ३ जून ,२०२० रोजी "निसर्ग" चक्रीवादळाचा तडाखा राज्यातील काही जिल्हयांमध्ये बसला आहे. या चक्रीवादळामुळे रायगड व रत्नागिरी ,सिंधुदुर्ग या जिल्हयामध्ये नागरिकांना स्थलांतरित केल्यामुळे तसेच घरांच्या पडझडीमुळे मदत छावण्यांमध्ये दाखल झालेल्या नागरिकांना अन्न,पाणी, निवारा व वैद्यकीय देखभाल या सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी तसेच चक्रीवादळामुळे सार्वजनिक ठिकाणी जमा झालेला कचरा, ढिगारे उचलून स्वच्छता करण्यासाठी उपरोक्त नमूद केलेल्या संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये रू. १.२५ कोटी इतका निधी रायगड व रत्नागिरी जिल्हयांना वितरित करण्यात आलेला आहे. याच प्रयोजनासाठी तसेच बहुवार्षिक पिकांचे नुकसान, मृत जनावरांसाठी मदत, पुर्णत: नष्ट/अंशत: पडझड झालेली कच्ची/पक्की घरे, नष्ट झालेल्या झोपडया या बाबींकरिता रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या जिल्हयांतील बाधित व्यक्ती/शेतकऱ्यांना वाढीव दराने मदत देण्याबाबत दिनांक ९.६.२०२० रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीतील निर्णयानुसार संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. सदर वाढीव दरानुसार बाधितांना मदतीचे वाटप करण्यासाठी संबंधित जिल्हयांना राज्य आपत्ती प्रतिसाद निधी व राज्य शासनाच्या निधीमधुन निधी उपलब्ध करून देण्याचा निर्णय राज्य कार्यकारी समितीच्या दिनांक ११.६.२०२० रोजी झालेल्या बैठकीमध्ये घेण्यात आला, त्यानुसार संदर्भाधीन क्रमांक ५ येथील शासन निर्णयान्वये रू ९७१४.१९ लक्ष इतका निधी वितरित करण्यात आला आहे. विभागीय आयुक्त, कोकण यांनी संदर्भाधीन क्रमांक ६ येथील पत्रान्वये रायगड व रत्नागिरी जिल्हयातील बाधित नागरिकांना विविध बाबींवर मदत देण्यासाठी वाढीव निधीची मागणी केली आहे. राज्य

कार्यकारी समितीच्या दिनांक १८.६.२०२० रोजी झालेल्या बैठकीत सदर मागणीवर विचार करून एकूण रू. ३९१७३.८५ लक्ष इतका निधी वितरित करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. सदर निर्णयास अनुसरून निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

"निसर्ग" चक्रीवादळामुळे बहुवार्षिक पिकांचे नुकसान, मृत जनावरांसाठी मदत, पुर्णत: नष्ट/अंशत: पडझड झालेली कच्ची/पक्की घरे, मत्स बोटी व जाळयांसाठी अर्थसहाय्य, मत्सबीज शेतीसाठी अर्थसहाय्य, दुकानदार व टपरीधारक यांना नुकसानीसाठी मदत या बाबींकरिता रायगड व रत्नागिरी या जिल्हयांना विभागीय आयुक्त,कोकण यांचेमार्फत राज्य आपत्ती प्रतिसाद निधी व राज्य शासनाच्या निधीमधून खालीलप्रमाणे संबंधित लेखाशीर्षाखाली निधी मंजूर करण्यात येत आहे.

(रूपये लाखात)

| बाब | लेखाशीर्ष | रायगड | रत्नागिरी | एकूण |
|---|---|---|---|---|
| बहुवार्षिक पिकांचे नुकसान | २२४५ २४५२ (SDRF निधी) | २०९८.८० | ५४०.०० | २६३८.८० |
| | २२४५ २३०९ (राज्य निधी) | ३७३१.२० | ९६०.०० | ४६९१.२० |
| मृत जनावरांसाठी मदत | २२४५ ०३१५ (SDRF निधी) | ४८.८५ | ६.०० | ५४.८५ |
| पुर्णत: नष्ट/मोठया प्रमाणावर / अंशत: पडझड झालेली कच्ची/पक्की घरे, नष्ट झालेल्या झोपडया | २२४५ ०२७१ (SDRF निधी) | १४८७९.६९ | ४५५९.७१ | १९४३९.४० |
| | २२४५ २३२७ (राज्य निधी) | ९४०५.७५ | २८८२.२९ | १२२८८.०४ |
| दुकानदार व टपरीधारकांना मदत | २२४५ २३८१ (राज्य निधी) | -- | २४.०० | २४.०० |
| मत्य बोटी व जाळयांसाठी / मत्सबीज शेतीसाठी अर्थसहाय्य | २२४५ ०३२४ (SDRF निधी) | २०.८७ | १६.६९ | ३७.५६ |
| एकूण | | ३०१८५.१६ | ८९८८.६९ | ३९१७३.८५ |

उपरोक्त निधी बीम्स प्रणालीवर विभागीय आयुक्त,कोकण यांना कार्यासन म-११ यांनी तात्काळ वितरित करावा.

२. वरील निधी खर्च करताना संदर्भाधीन सर्व शासन निर्णयातील सुचनांचे व निकषांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. संदर्भाधीन क्रमांक ४ येथील दिनांक १०.६.२०२० च्या शासन निर्णयान्वये मदतीचे वाढीव दर मंजूर करण्यात आले आहेत. त्या वाढीव दरापैकी **राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या (SDRF) संदर्भाधीन क्रमांक १ व २ येथील शासन निर्णयातील दराने** मदत प्रदान करण्यासाठी २२४५ २४५२, २२४५ ०३१५, २२४५ ०२७१,व २२४५ ०३२४ या लेखाशीर्षाखाली वितरित करण्यात आलेला निधी खर्च करण्यात यावा. आणि **वाढीव मंजूर दर वजा SDRF दर यातील फरकाच्या मदतीची रक्कम** लेखाशीर्ष २२४५ २३०९, २२४५ २३२७ व २२४५ २३८१ या लेखाशीर्षाखाली वितरित करण्यात आलेला निधीतून भागविण्यात यावा. ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा.

३. पंचनामे करण्यात आल्यानंतर लाभार्थी निश्चित करण्यात यावेत. या शासन निर्णयान्वये संपूर्ण रक्कम बीम्स प्रणालीवर वितरित करण्यात येत असली तरी, लाभार्थी निश्चित झाल्यानंतर वित्तिय शिस्तीच्या दृष्टीकोनातून संबंधित जिल्हाधिकारी यांनी प्रत्यक्ष गरजेनुसारच कोषागारातून रक्कम आहरित करून त्यानंतरच रक्कम लाभार्थ्यांच्या थेट बँक खात्यामध्ये ऑनलाईन पध्दतीने हस्तातंरित करण्याबाबत दक्षता घ्यावी. सदर निधी अनावश्यकरित्या कोषागारातून आहरित करून बँक खात्यामध्ये काढून ठेवण्यात येवू नये. या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच खर्च करण्यात यावा. लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्हयांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा. या सर्व सुचनांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

४. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून तसेच राज्य शासनाच्या निधीमधून उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

५. संदर्भाधीन क्रमांक ३ व ५ येथील शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० मध्ये वितरित केलेल्या निधीची १००% उपयोगिता प्रमाणपत्रे व सन २०२०-२१ मध्ये यापूर्वी वितरित केलेल्या तसेच या शासन निर्णयान्वये वितरित करण्यास मान्यता देण्यात असलेल्या निधीच्या खर्चाची ७५% खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे सादर केल्यानंतरच पुढील अतिरिक्त निधी मागणीचे प्रस्ताव विभागीय आयुक्त, कोकण यांनी शासनास सादर करावेत.

६. वरील प्रयोजनासाठी प्रधान लेखाशीर्ष २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर चक्रीवादळे इत्यादी अंतर्गत वरील विवरणपत्रात दर्शविलेल्या सर्व उप/गौण शिर्षाखाली निधी उपलब्ध करून देण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : १०६/२०२०/व्यय-९, दिनांक १८.०६.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००६१८१८२९२११८१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(सु.ह.उमराणीकर)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,

२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
३. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
४. विभागीय आयुक्त,कोकण,
५. जिल्हाधिकारी, रायगड/रत्नागिरी/सिंधुदुर्ग,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
८. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड/रत्नागिरी /सिंधुदुर्ग,
१०. मा.मंत्री ( मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
११. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१२. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१३. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१४. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१५. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ )